**२०२४-२०२५ या आर्थिक वर्षासाठी राज्य सहकारी संघ (२४२५ ०२१८) या योजनेंतर्गत धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या संस्थेस निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र: संकीर्ण-२०२५/प्र.क्र. ३२ /२२-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २६ मार्च, २०२५.

<u>संदर्भ</u> :- १) शासन निर्णय कृषी व सहकार विभाग क्र. सीटीआर-१४७२/१५०७८-सी ७, दि.६.०९.१९७२.
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र जा.क्र.४-सआ/कायदा व वै.का/ धनं.गाडगीळ सप्रसं/निधी मागणी/७१ /२०२५, दिनांक- ०३.०३.२०२५.

<u>**प्रस्तावना :-**</u>

धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंधक संस्थान, नागपूर या प्रशिक्षण विद्यालयाची स्थापना १९७२ मध्ये करण्यात आलेली आहे. त्याअन्वये सदर महाविद्यालय महाराष्ट्रामध्ये दुसरे सहकार प्रशिक्षण विद्यालय नागपूर येथे केंद्र व राज्य शासनाच्या समभाग अनुदान तत्वावर सुरु करण्यात आले आहे. या संस्थानाचा खर्च केंद्र व राज्य शासनाने समप्रमाणात (५०:५०) करावयाचा आहे. त्यानुसार राज्य शासनाकडून ५० टक्के अनुदानाची रक्कमेच्या अनुषंगाने मागणी क्रमांक व्ही-२, २४२५, सहकार ००३ (२) राज्य सहकारी संघ (०२)(०२) राज्य सहकारी संघ (कार्यक्रम) (२४२५०२१८) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाअंतर्गत निधी अर्थसंकल्पीत करण्यात येत आहे. सन २०२४-२०२५ या चालू वर्षाकरिता रु. ९०.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत केली आहे.

केंद्र शासनाकडून त्यांच्या हिश्श्याचे सन २०२४-२०२५ या वर्षाकरीता रुपये ९९.७५ लक्ष इतका निधी वितरीत केला आहे. त्यास अनुसरुन धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या सहकारी प्रशिक्षण महाविद्यालयास केंद्र शासनाच्या हिश्श्यानुरुप राज्य शासनाचा समरुप हिस्सा सन २०२४-२५ करिता राज्य सहकारी संघ (२४२५ ०२१८) या योजनेंतर्गत अर्थसंकल्पीत केलेल्या रु. ९०.०० लक्ष या तरतूदीमधून रु. ६३.०० लक्ष (रुपये त्रेसष्ठ लक्ष फक्त) इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी संघाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या सहकारी प्रशिक्षण महाविद्यालयास केंद्र शासन समरुप राज्य शासनाच्या ५० टक्के हिश्यापोटी देय असणारा रक्कमेपैकी रु. ६३.०० लक्ष (रुपये त्रेसष्ठ लक्ष फक्त) इतका निधी वरील संस्थेस याद्वारे वितरित करण्यात येत आहे.

२. उपरोक्त बाबींसाठी होणारा खर्च, मागणी क्रमांक व्ही-२, २४२५, सहकार ००३ (२) राज्य सहकारी संघ (०२) (०२) राज्य सहकारी संघ (कार्यक्रम) (२४२५०२१८) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) याखाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सध्याची शैक्षणिक क्षेत्रातील फी आकारणी पाहता संस्थानाने आपल्या उत्पन्नाचे स्त्रोत वाढविण्यासाठी आकारण्यात येणाऱ्या फी शुल्कामध्ये पर्याप्त स्वरुपात वाढ करण्याच्या अधीन राहून सदर आर्थिक तरतूद वितरीत करण्यात येत आहे.

४. उपरोक्त निधीचा धनादेश कोषागार कार्यालयातून काढून प्रत्यक्ष संस्थानास देण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी म्हणून पुढील अधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे:-

आहरण व संवितरण अधिकारी-लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे, नियंत्रक अधिकारी-अप्पर निबंधक (वसुली व नियोजन), सहकारी संस्था, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे. सदर निधी ज्या कारणासाठी मंजूर केला आहे. त्याच कारणासाठी खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी. तसेच या लेखाशिर्षाखालील निधी खर्च करताना प्रचलित नियम व विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा. सदर संस्थेस वितरित केलेला रु. ६३.०० लक्ष (रुपये त्रेसष्ठ लक्ष फक्त) निधी खर्च केल्याबाबतचे संस्थेकडून उपयोगिता प्रमाणपत्र त्यांनी प्राप्त करुन घ्यावे.

५. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभागाच्या सं. क्र.१४१/१४३१, दिनांक १८.०३.२०२५ तसेच वित्त विभागाच्या अनौसं क्र.२०३/२०२५/व्यय-२, दिनांक १९/०३/२०२५ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३२६१५३५५८५३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

ANKUSH PANDURANG SHINGADE

Digitally signed by ANKUSH PANDURANG SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D17334615589208DCD97DD078B, cn=ANKUSH PANDURANG SHINGADE
Date: 2025.03.26 17:38:51 +05'30'

**(अंकुश शिंगाडे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई/नागपूर.
३) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) अप्पर निबंधक, (वसुली व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
११) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ, पुणे.
१२) प्राचार्य, धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, आयसीएम बस स्टॉप, मिनी बायपास रोड, न्यू नंदनवन, नागपूर- ४४० ००९.
१३) कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासन व्यय-२/अर्थसंकल्प-१३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती, कार्यासन-२२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.